**हंगाम २०१७-१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत तूर व हरभरा खरेदीसाठी NeML पोर्टलवर नोंदणी केलेले शेतकरी, मात्र ज्यांच्याकडून तूर अथवा हरभ-याची खरेदी होऊ शकली नाही, अशा शेतक-यांना अनुदान देण्यासाठी एकूण रुपये ७०.०० कोटी (रुपये सत्तर कोटी फक्त) आकस्मिकता निधीतून उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: सपस-२०१८/प्र.क्र. १६७/२४ स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
दिनांक:- १४ जून, २०१८

<u>संदर्भ</u>:- (१) दिनांक ०५/०६/२०१८ रोजीच्या राज्य मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णय
(२) शासन ज्ञापन, वित्त विभाग क्र.आकनि २०१८/प्र.क्र.६/अर्थ १३, दिनांक ८ जून, २०१८.

**प्रस्तावना:-**

हंगाम २०१७-१८ साठी राज्यात किमान आधारभूत किंमत योजनंतर्गत नाफेडच्या वतीने पणन महासंघ व विदर्भ पणन महासंघामार्फत तूर व हरभरा खरेदी अनुक्रमे दिनांक १ फेब्रुवारी २०१८ व दिनांक १ मार्च, २०१८ पासून सुरु करण्यात आलेली आहे. तथापी, गतवर्षीच्या हंगामात तूरीची मोठ्या प्रमाणात झालेल्या खरेदीमुळे राज्यातील गोदामे पूर्णपणे भरलेली असल्याने राज्यातील तूर खरेदी व हरभरा खरेदी अत्यंत धीम्या गतीने सुरु होती. राज्य वखार महामंडळाने राज्यातील महामंडळाव्यतिरिक्त अन्य १८३ गोदामे भाडेतत्वावर घेतली आहेत. तथापि,सदर साठवणूक सुविधा अत्यंत अपुरी आहे. सध्या राज्यात मान्सूनपूर्व पाऊस सुरु आहे.तसेच जूनच्या दुसऱ्या आठवडयात मान्सूनचे आगमन अपेक्षित आहे. राज्यात खरेदी केलेली तूर व हरभरा साठवणूकीसाठी जागा उपलब्ध नाही.

दिनांक १५/०५/२०१८ पासून तूरीची खरेदी बंद झालेली असून, उर्वरित १,९२,०७६ शेतकऱ्यांची तूर खरेदी करणे शिल्लक आहे. तसेच दिनांक २९/०५/२०१८ पासून हरभऱ्याची खरेदी बंद झालेली असून, उर्वरित २,१८,६०८ शेतकऱ्यांची तूर खरेदी करणे शिल्लक आहे. दिनांक ०५.०६.२०१८ च्या पत्रान्वये नाफेडने हरभरा खरेदीसाठी दिनांक १३.०६.२०१८ पर्यतची फक्त ८ दिवसांची मुदतवाढ दिलेली आहे. सदर पार्श्वभूमी लक्षात घेऊन, तूर व हरभरा खरेदीसाठी नोंदणी केलेले शेतकरी परंतु त्यांच्याकडून तूर अथवा हरभ-याची खरेदी झाली नाही, अशा शेतक-यांना रुपये १०००/- प्रति क्विंटल अनुदान देण्याचा निर्णय दिनांक ०५.०६.२०१८ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत घेण्यात आला आहे. योजनेचे निकष व कार्यपध्दती याबाबत मंत्रिमंडळ उपसमितीच्या शिफारशीनुसार स्वतंत्र शासन निर्णय निर्गमित करण्याची कार्यवाही सुरु आहे.

मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार रुपये १०००/- प्रति क्विंटलच्या मर्यादेत अनुदान देण्यासाठी पणन महासंघास सुरुवातीस राज्य शासनाकडून निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत तूर व हरभरा खरेदीसाठी NeML पोर्टलवर नोंदणी केलेले शेतकरी परंतु त्यांच्याकडून तूर अथवा हरभ-याची खरेदी झाली नाही, अशा शेतक-यांना रुपये १०००/- प्रति क्विंटल अनुदान देण्यासाठीची निकड विचारात घेऊन, रुपये ७०.०० कोटी (रुपये सत्तर कोटी फक्त) इतकी रक्कम आकस्मिकता निधीतून शासन उपलब्ध करुन देत आहे.

२. या योजनेंतर्गत होणारा खर्च नमूद लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या आकस्मिकता निधीतून भागविण्यात यावा:-

मागणी क्रमांक व्ही-२
२४२५ सहकार
००
१९५-सहकारी संस्थांना सहाय्य
(०१) सहकारी पत संस्थांना सहाय्य
(०१)(०४) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघामार्फत शेतमालाची खरेदी करण्यासाठी लागलेल्या अनुषंगिक खर्चाची रक्कम अदा करण्याकरिता अर्थसहाय्य
(अनिवार्य) (२४२५ २५४२)
३३, अर्थसहाय्य, रु.७०,००,००,०००/-
(एकूण रु. ७०,००,००,०००/-
**आकस्मिकता निधी संकेतांक (८००० ७५०२)**

३. या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेला रुपये ७०,००,००,०००/- "(रुपये सत्तर कोटी फक्त) इतकी रक्कम RTGS सुविधेद्वारे महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास अदा करावी. याबाबतचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| मागणीदार/पुरवठादार/कंत्राटदाराचे नाव/फर्मचे नाव | महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्या. मुंबई |
| कार्यालयाचे नाव व पत्ता (ज्या प्रकरणी लागू आहे) | कनमूर हाऊस, नरसीनाथा स्ट्रीट,पो.बॉ.क्र ५०८०, मस्जीद, मुंबई-९ |
| बँक खाते क्रमांक | 6242918329 |
| बँक खात्याचा प्रकार | चालू खाते. |
| बँकेचे नाव | इंडियन बँक |

| | |
|---|---|
| बँक शाखेचे नाव व पत्ता | शाखा मांडवी, मस्जीद |
| बँक शाखेचा संकेतांक | 00016 |
| एमआयसीआर क्रमांक | 400019016 |
| आयएफएससी संकेतांक | IDIB000M013 |

४. या योजनेंतर्गत कर्जाची रक्कम अदा करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई यांना शासनाच्या वतीने प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. या शासन निर्णयातील मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्यासाठी श्री.र.गं.बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोख शाखा),सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी व श्री.का.गो.वळवी, उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. या रकमेच्या देयकावर आकस्मिकता निधी, अग्रीम शासन क्रमांक-आकनि-२०१८/ प्र.क्र.६/ अर्थ १३, दिनांक ८ जून,२०१८ अन्वये मंजूर असे लाल शाईने लिहावे व ते लाल शाईने अधोरेखित करावे.

७. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केला आहे, त्याच कारणासाठी वापर करुन संबंधित महासंघाने त्यासंबंधीचा अनुपालन अहवाल विनाविलंब शासनास सादर करावा. तसेच अग्रिमामधून प्रत्यक्ष मासिक खर्च केल्याची एकत्रित माहिती त्या महिन्यानंतरच्या १५ तारखेपर्यत शासनास सादर करावी.

८. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / वित्तीय संस्थांना वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकम प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

९. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं-३००/ २०१८/ व्यय २, दिनांक ७/०६/२०१८ अनुसार त्यांच्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१४१५०७४४९२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ghadyale Sunanda Mohanrao

Digitally signed by Ghadyale Sunanda Mohanrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textiles, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9edecaf650dad6e8311b45, cn=Ghadyale Sunanda Mohanrao
Date: 2018.06.14 15:09:01 +05'30'

**(सुनंदा मो. घड्याळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
५) मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
६) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
७) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) अप्पर मुख्य सचिव(वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई-९
१०) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
१३) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
१४) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
१५) अध्यक्ष/सचिव, कृषी उत्पन्न बाजार समिती(सर्व)
१६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१९) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२०) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-३/१३, मंत्रालय, मुंबई-३२
२१) कार्यासन अधिकारी, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२) निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई,